**आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह, ठाणे येथे मंजुर असलेल्या एकूण १००० क्षमतेपैकी ३२८ क्षमतेच्या मुलांच्या वसतीगृहासाठी इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देणेबाबत..**

**महाराष्ट्र शासन**
**आदिवासी विकास विभाग**
**शासन निर्णय क्रमांकः आवगृ-२०१४/प्र.क्र.१०५/ का. १२**
मंत्रालय, मुंबई ४०० ०३२.
तारीख: २० ऑगस्ट,२०१४.

**वाचा :** आयुक्त, आदिवासी विकास आयुक्तालय, महाराष्ट्र राज्य, नाशिक यांचे पत्र क्रमांक इमाबां-२०१४/प्र.क्र.२३/का.८(३), दिनांक ०७.०६.२०१४.

**प्रस्तावना :** आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांनी उपरोक्त पत्रान्वये सादर केलेल्या आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह, ठाणे येथे मंजुर असलेल्या एकूण १००० क्षमतेपैकी ३२८ क्षमतेच्या मुलांच्या वसतीगृहासाठी इमारत बांधकामाच्या अंदाजपत्रकास प्रशासकीय मान्यता देण्याची बाब शासनाच्या विचाराधीन होती.

**शासन निर्णय :**

आदिवासी मुलांचे शासकीय वसतीगृह, ठाणे येथे मंजुर असलेल्या एकूण १००० क्षमतेपैकी ३२८ क्षमतेच्या मुलांच्या वसतीगृहासाठी इमारत बांधकामाच्या रुपये २०,२१,०३,९१६/-(अक्षरी रुपये वीस कोटी एकवीस लक्ष तीन हजार नऊशे सोळा फक्त) इतक्या रकमेच्या अंदाजपत्रकास खालील अटींच्या अधीन राहून प्रशासकीय मान्यता देण्यात येत आहे.

(१) काम सुरू करण्यापूर्वी नमुना नकाशा, मांडणी नकाशा तसेच विस्तृत नकाशास वास्तुविशारदांकडून मंजूरी घेऊनच बांधकाम सुरु करावे.

(२) इमारत बांधकाम सुरु करण्यापुर्वी बांधकामासाठी आवश्यक असलेली जमीन विभागाच्या ताब्यात असण्याची खात्री करण्यात यावी.

(३) ढोबळ स्वरुपात धरण्यात आलेल्या तरतुदींबाबत काम करतेवेळी विस्तृत अंदाजपत्रक करुनच काम हाती घ्यावे.

(४) प्रत्यक्ष काम करतेवेळी पर्यावरण विभाग, शासन निर्णय क्र.इएनव्ही-२०१३/ प्र.क्र.१७७/तां.क.१, दि.१०.०१.२०१४ मध्ये उल्लेख करण्यात आलेल्या मार्गदर्शक तत्वानुसार कार्यवाही करण्यात यावी.

(५) नकाशा व अंदाजपत्रकास उपभोक्ता खात्याचे साक्षांकन घेण्याची जबाबदारी आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक यांची राहील.

(६) सविस्तर अंदाजपत्रकात flooring/skirting साठी उल्लेख केलेल्या glazed tiles ऐवजी योग्य प्रकारचे टाईल्स वापरावे. तसेच bore data बाबतची पूर्ततादेखील करण्यात यावी.

(७) मांडणी नकाशा व शासनपत्र क्र. शाआशा-२०१०/प्र.क्र.२०७/का.१२ दि.७.४.२०११ अन्वये घोषीत केलेल्या Type -plan नुसार बांधकाम करण्यात यावे.

(८) सदर बांधकामाचा खर्च मंजूर तरतूदीतून भागविण्यात यावा.

२. सदर शासन निर्णय सार्वजनिक बांधकाम विभागाच्या अनौपचारिक संदर्भ क्र .३२०/इमा-२, दिनांक १३.०८.२०१४ अन्वये प्राप्त सहमतीनुसार आणि शासन निर्णय वित्त विभाग क्रमांक -विअप्र-१०.०८/प्र.क्र.७०/२००८/ विनियम, दिनांक १५.५.२००९ मधील भाग पहिला, उपविभागपाच - -अनुक्रमांक१ नियम १३४ अनुसार प्रशासकीय विभागांना प्रत्यार्पित केलेल्या अधिकारानुसार निर्गमित करण्यात येत आहे

सदर शासन निर्णय महाराष्ट्र शासनाच्या www.maharashtra.gov.in या संकेतस्थळावर उपलब्ध करण्यात आला असून त्याचा संकेताक २०१४०८२७१२१०५१५८२४ असा आहे. हा आदेश डिजीटल स्वाक्षरीने साक्षांकित करुन काढण्यात येत आहे.

महाराष्ट्राचे राज्यपाल यांच्या आदेशानुसार व नावाने.

Sadanand Nurya Gavit

Digitally signed by Sadanand Nurya Gavit
DN: c=IN, o=Government of Maharashtra, ou=Tribal Development dept, postalCode=400032, st=Maharashtra, cn=Sadanand Nurya Gavit
Date: 2014.08.27 12:06:32 +05'30'

**(स. नु. गावीत)**
**शासनाचे सह सचिव**

**प्रत,**

१) महालेखापाल (लेखापरिक्षा), महाराष्ट्र-१, मुंबई.
२) महालेखापाल (लेखा व अनुज्ञेयता), महाराष्ट्र-१, मुंबई.
३) आयुक्त, आदिवासी विकास, नाशिक.
४) आयुक्त, मीरा-भाईंदर महानगरपालिका, जि.ठाणे.

५) अपर आयुक्त, आदिवासी विकास, ठाणे.
६) मुख्य अभियंता, नाशिक.
७) जिल्हाधिकारी, ठाणे.
८) अधीक्षक अभियंता, सार्वजनिक बांधकाम मंडळ, ठाणे.
९) उप अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मीरा-भाईंदर महानगरपालिका, जि.ठाणे.
१०) कार्यकारी अभियंता, सार्वजनिक बांधकाम विभाग, मीरा-भाईंदर महानगरपालिका, जि.ठाणे.
११) जिल्हा कोषागार अधिकारी, ठाणे.
१२) प्रकल्प अधिकारी, एकात्मिक आदिवासी विकास प्रकल्प, शहापूर.
१३) सह सचिव / उप सचिव, आदिवासी विकास विभाग, मंत्रालय,मुंबई.
१४) आदिवासी विकास विभाग, (कार्यासन ६), मंत्रालय, मुंबई.
१५) निवड नस्ती (का.१२).